एव्हिडंस बेस्ड प्रकल्प संनियंत्रण प्रणाली (EBPMS ) विकसित करण्यासाठी गठित समितीस मुदतवाढ देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: माविका २०१५/प्र.क्र.४९/का.१४१८.**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,**
**दिनांक: २१ डिसेंबर, २०१८.**

**वाचा:**

१) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.माविका २०१५/प्र.क्र. ४९/का.१४१८, दि.०१.०८.२०१५.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.माविका २०१५/प्र.क्र. ४९/का.१४१८, दि.०५.०७.२०१६.
३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.माविका २०१५/प्र.क्र. ४९/का.१४१८, दि.०३.०२.२०१८.

**प्रस्तावना:**

मा. मंत्री (नियोजन) यांनी त्यांच्या सन २०१५ च्या अर्थसंकल्पिय भाषणात योजनांसाठी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा विनियोग योग्य प्रकारे होण्यासाठी तसेच योजनांवर योग्य देखरेख करण्यासाठी "एव्हिडंस बेस्ड फोटोग्राफीद्वारे (Evidence Based Photography)" नियंत्रण करण्याच्या दृष्टीने मंत्रालयीन स्तरावर "स्वतंत्र कक्ष" स्थापन करण्यात येईल अशी घोषणा केली. त्या अनुषंगाने अर्थसंकल्पिय योजनांसाठी "एव्हिडंस बेस्ड प्रकल्प संनियंत्रण प्रणाली (EBPMS)" विकसित करण्यासाठी कार्यगट गठित करण्याबाबत निर्णय घेण्यात आला.

२. "एव्हिडंस बेस्ड प्रकल्प संनियंत्रण प्रणाली (EBPMS)" विकसित करण्याच्या दृष्टीने अभ्यास करणे व या प्रणालीचे नियंत्रण करण्याच्या अनुषंगाने "स्वंतत्र कक्ष" स्थापन करण्यासाठी नियोजन विभागाचे संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णय अन्वये "अपर मुख्य सचिव (नियोजन)" यांच्या अध्यक्षतेखाली कार्यगट गठित करण्यात आला होता. सदर कार्यगटाने केलेल्या शिफारसीस अनुसरुन करण्यात येणा-या कार्यवाहीवर संनियत्रण करण्यासाठी नियोजन विभागाचे संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णय अन्वये "अपर मुख्य सचिव (नियोजन)" यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आलेली होती. ही समिती केवळ १ वर्षासाठी गठीत करण्यात आली होती. नियोजन विभागाचे संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णय अन्वये सदर समितीस दि.३१.१२.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

३. "एव्हिडंस बेस्ड प्रकल्प संनियंत्रण प्रणाली (EBPMS)" विकसित करण्यासाठी करावयाच्या टप्पा "A" व "B" कार्यवाहीमधील (१) As-Is-Study-Report, To-be-Report (२) Detail project Report (DPR) व (३) Functional Requirement Specification (FRS) ही कामे पुर्ण झाली आहेत. उर्वरीत टप्पा "C" मधील (अ) Request for Proposal (RFP) नुसार System Integrator(SI) ची नियुक्ती करणे व SRS

Documents चा आढावा घेणे, (ब) प्रणाली विकसित करण्यासाठी निश्चित केलेल्या हार्डवेअर व पॅकेज सॉफ्टवेअर यांचे मुल्यमापन करणे व (क) सदर प्रणालीच्या अनुषंगाने कामाच्या प्रगतीबाबत वेळोवेळी आढावा घेणे अशी कामे कालबध्द व जलदगतीने विकसित करण्याच्या अनुषंगाने करण्यात येणा-या विविध कार्यवाहीवर सनियंत्रण व मार्गदर्शन करण्यासाठी "अपर मुख्य सचिव (नियोजन)" यांच्या अध्यक्षतेखालील वरील समितीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

"एव्हिडंस बेस्ड प्रकल्प संनियंत्रण प्रणाली" (Evidence Based Photography Monitoring System) विकसित करण्यासाठी "अपर मुख्य सचिव (नियोजन)" यांच्या अध्यक्षतेखाली नियोजन विभागाचे संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या समितीस दि.३१ डिसेंबर, २०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८१२२११२३३५६६०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2018.12.21 15:25:35 +05'30'

**(वि.फ.वसावे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
६) विभागीय आयुक्त, (सर्व)
७) जिल्हाधिकारी, (सर्व)
८) संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र, व्हीएनआयटी कॉलेज परिसर, दक्षिण अंबाझरी रोड, नागपूर-४४०००१.
९) जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, (सर्व)

१०) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
११) उप महासंचालक, नॅशनल इन्फोर्मेटीक्स सेंटर, पुणे
१२) संचालक ,अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
१३) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, (सर्व)
१४) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)
१५) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
१६) नियोजन विभागातील सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव
१७) निवड नस्ती (का.१४१८), नियोजन विभाग.